**महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाचे फोर्ट, मुंबई येथील कार्यालयाचे इमारत दुरुस्ती व नुतनीकरण करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : केव्हीबी-२०२३/प्र.क्र.१७०/उद्योग-६.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १२ मार्च, २०२४.

**वाचा :**
१) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोदयोग मंडळ, यांचे पत्र क्र.कार्यासन-४/ उद्योग/प्रशा/इमारत दुरुस्ती/प्रमा/२०२३-२४/२३२६, दि.१३/११/२०२३.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोदयोग मंडळ, यांचे पत्र क्र. कार्यासन-४/ उद्योग/प्रशा/इमारत दुरुस्ती/प्रमा/२०२३-२४/३०४४, दि.११/०१/२०२४.
३) सहायक अभियंता (इमारती), प्रभाग-अ, बृहन्मुंबई महानगर, मुंबई यांची सुचना क्र.ACA/Ex.Eng.Do.(B&F)A/२४०/३५४/B&F दि.२१/०२/२०२२.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाचे फोर्ट, मुंबई येथील कार्यालयाचे इमारत दुरुस्ती व नुतनीकरणाच्या कामाला प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव संदर्भ क्र.१ व २ चे पत्रान्वये शासनास प्राप्त झाला होता. बृहन्मुंबई महानगरपालीकेकडून संदर्भ क्र. ३ नुसार महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाचे फोर्ट, मुंबई येथील कार्यालयाच्या इमारत क्र.१९/२१, मनोहरदास मार्ग, फोर्ट, मुंबई-०१ या इमारतीचे संरचनात्मक परिक्षण (Structural Audit) अहवाल प्राप्त झाला आहे. या संरचनात्मक परिक्षण (Structural Audit) अहवालानुसार सदर इमारत ही भग्न अवस्थेला आली असून पडण्याची शक्यता आहे आणि राहण्यास देखील धोकादायक आहे. त्याअनुषंगाने महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाचे फोर्ट, मुंबई येथील कार्यालयाचे इमारत दुरुस्ती व नुतनीकरणाच्या स्थापत्य कामाचे मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांच्या तांत्रिक सहमतीसह दरसूची २०२२-२३(SSR) नुसारचे अंदाजपत्रक आणि मुख्य अभियंता(विद्यूत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांची तांत्रिक मान्यता असलेले दरसूची २०२३-२४(CSR) नुसारचे विद्यूत कामाचे अंदाजपत्रक प्राप्त झाले आहे. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय यांचेकडून सदर अंदाजपत्रकात सुधारणा करुन त्यास तांत्रिक मान्यता प्राप्त झाली आहे. महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाचे फोर्ट, मुंबई येथील कार्यालयाचे इमारत दुरुस्ती व नुतनीकरणाच्या कामाच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाच्या फोर्ट, मुंबई येथील कार्यालयाचे इमारत दुरुस्ती व नुतनीकरणाच्या कामासाठी लागणा-या खर्चाच्या रु.४,४१,३८,३१९/- (अक्षरी रुपये चार कोटी, एक्केचाळीस लाख, अडतीस हजार, तीनशे बासष्ट) किंमतीच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. सदरची कामे प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेतच पुर्ण करावीत.
२. सदर देखभाल व दुरुस्तीची कामे यासाठी मंजूर व उपलब्ध नियतव्ययातून खर्च करावा.
३. महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाचे फोर्ट, मुंबई येथील कार्यालयाचे इमारत दुरुस्ती व नुतनीकरणाचे काम सार्वजनिक बांधकाम विभागाच्या व शासनाच्या प्रचलीत नियमानुसारच करावे.
४. बृहन्मुंबई महानगरपालीकेकडून प्राप्त झालेल्या संरचनात्मक परिक्षण (Structural Audit) अहवालात नमुद बाबींची पुर्तता होईल याची दक्षता घेण्यात यावी.
५. काम सुरु करण्यापुर्वी सदर जागेच्या मालकी हक्काबाबत खातरजमा करण्यात यावी.

६. या कामासाठी उपलब्ध निधीच्या मर्यादेतच टप्प्याटप्प्यानेच कामे हाती घेण्यात यावीत. अतिरिक्त दायीत्व निर्माण करण्यात येऊ नये.

७. या विषयाबाबत नियंत्रक व महालेखापाल यांचे काही आक्षेप/परिच्छेद प्रलंबित नसल्याची अथवा न्यायालयीन वाद नसल्याची खातरजमा करण्यात यावी.

८. प्रस्तावातील खरेदीशी संबंधीत बाबींकरीता उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४ दि.०१/१२/२०१६ व वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील कार्यपद्धती व अटींचे पालन करावे.

९. वित्त विभागाच्या दि.१२/०४/२०२३ व दि.०५/०२/२०२४ रोजीच्या परिपत्रकातील अटी व वित्त विभागाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे उल्लंघन होणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०. सदर इमारतीच्या दुरुस्ती व नुतनीकरणाच्या कामांची अंमलबजावणी करतांना कामांचे एकत्रिकरण करुन नियमानुसार ई-निविदा प्रणालीचा अवलंब करावा.

११. बृहन्मुंबई महानगरपालीकेकडून प्राप्त झालेल्या संरचनात्मक परिक्षण (Structural Audit) अहवालातील सुचनांचे पालन करावे.

महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाचे फोर्ट, मुंबई येथील कार्यालयाचे इमारत दुरुस्ती व नुतनीकरणाच्या स्थापत्य व विद्यूत कामाचे सार्वजनिक बांधकाम विभागाकडून अंतिम केलेले सन २०२२-२३ च्या दरसुचीवर आधारीत सुधारित अंदाजपत्रक **परिशिष्ट-१** प्रमाणे आहे.

सदर खर्चाकरीता विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी हे आहरण व संवितरण अधिकारी आहेत. यावरील खर्च "मागणी क्रमांक के-७, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०५ खादी व ग्रामोद्योग (००)(००)(०१) खादी व ग्रामोद्योग मंडळाला सहाय्यक अनुदान (दत्तमत) (२८५१ ०५८५) ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या उद्दिष्टाखालील अर्थसंकल्पीय मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय भाग-२, दि.२०/०९/२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तीक-१९७८ च्या भाग-पहिला, उपविभाग-पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीकेतील परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या अधिकारानुसार सदर खर्चास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.६८/२०२४/इमारती-२ दि.०५/०२/२०२४ व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.५३७/व्यय-१६ दि.२४/०१/२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीने सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२४०३१२१२०२५५००१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत स्वाक्षरीने करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR. SHRIKANT LAXMANRAO PULKUNDWAR

Digitally signed by DR. SHRIKANT LAXMANRAO PULKUNDWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=feb24b5f5d1512bb47f7bae5ad1db4953358cd43c999bdf0814c6bb78364d50a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C10A1E6C8FBE08C1180978BD3ED8A151ED05202D522B09B9960341C2F080906D, cn=DR. SHRIKANT LAXMANRAO PULKUNDWAR
Date: 2024.03.12 12:12:00 +05'30'

**( डॉ. श्रीकांत ल. पुलकुंडवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति -**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.

३. प्रधान सचिव(उद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई-०१
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई.
७. मुख्य अभियंता(विद्यूत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई.
८. अर्थ सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११. वरिष्ठ उप महालेखापाल (पडताळणी) बाह्य लेखा परीक्षा विभाग, मुंबई.
१२. लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई. (५ प्रती)
१३. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६/अर्थसंकल्प-३,१४/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई -३२
१४. कार्यासन अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती (उद्योग विभाग -६)

शासन निर्णय क्रमांक : केव्हीबी-२०२३/प्र.क्र.१७०/उद्योग-६ दि. १२ मार्च, २०२४ चे परिशिष्ट

# परिशिष्ट-१

**Name of the Department : Department of Industries, Power, Labour and Minerals**

**Name of Work : Repair and Renovation of Office Building of Maharashtra State Khadi and Village Industries Board at Fort, Mumbai**

**Executing Agency : Public Works Department.**

**Land Availability:**

**Architect :**

**RECAPITULATION SHEET**

| Sr. No. | Particulars of Scope | Unit Rate Norms Rs per (Sqmt./ Meter/ LumpSum etc.) | | Cost Rs. Component Wise | Total |
|---|---|---|---|---|---|
| **A** | **ESSENTIAL ITEMS (Components)** | | | | |
| **1** | **Building proper (Built Up Area-Sq.m)** | | | | |
| | Overall construction and water supply works | - | - | 2,55,28,006 | |
| | | | | **Total A** | **2,55,28,006** |
| **B** | Electrical Installation, Computer LAN, Telephone Wiring | - | - | 31,65,628 | |
| | 14 Air Conditioning | - | - | 11,14,246 | |
| | Wireless Audio Conference (12+1 Mic) Video Projection, Soft VC. | - | - | 22,81,985 | |
| | CCTV | - | - | 5,67,705 | |
| | | | | **Total B** | **71,29,564** |
| | | **Project Cost (A+B)** | | | **3,26,57,570** |
| **(B)** | **PROVISION** | | | | |
| | (i) Contingencies 4% on (P) | | | **13,06,303** | |
| | (ii) GST 18% on (P) | | | **58,78,363** | |
| | (iii) Price Escalation 5% on (P) | | | **16,32,879** | |
| | (iv) PMC Charges 1.5% on (P) | | | **4,89,864** | |
| | (v) Labour Insurance 1% on (P) | | | **3,26,576** | |
| | (vi) Centage Charges (Civil) 5% on (A) | | | **12,76,400** | |
| | (vii) Electrical Charges 8% on (B) | | | **5,70,365** | |
| | | | | **Sub Total** | **1,14,80,749** |
| | **TOTAL PROJECT COST (TPC)** | | | | **4,41,38,319** |
| | **Say Rs. Lakhs** | | | **441.38** | |